# का का कुमारी

लेखिका : महाश्वेता देवी
चित्रकार : कन्यिका किणी
अनुवाद : स्नेहलता दातार



ज्योत्स्ना प्रकाशन



*Ka Ka Kumari (Marathi)*

प्रकाशक :
मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग
१६२ ज. शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४

First published in India in 2003 in English
as *The Why-Why Girl* by Tulika Publishers

First published in India in 2003 in Marathi
as *Kaan-Kaan Kumari* by Tulika Publishers


ज्योत्स्ना प्रकाशनची पहिली आवृत्ती : २००९

मुद्रक : रिच प्रिंट्स, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०

**मूल्य पस्तीस रुपये**

ISBN 978-81-7925-201-7

# का का कुमारी

लेखिका : महाश्वेता देवी

चित्रकार : कन्यिका किणी

अनुवाद : स्नेहलता दातार



ज्योत्स्ना प्रकाशन




## "पण का?"

एक दहा वर्षांची मुलगी हा प्रश्न विचारत होती.
ती एका मोठ्या सापाच्या मागे लागली होती.
मी तिच्यामागे पळत गेले. तिची वेणी धरून तिला मागे ओढत ओरडले,
"नाही, मोयना नको!"
"का नको?" मोयनाने विचारलं.
"अगं, तो साधा गवत्या साप किंवा धामण नाही.
नाग आहे तो," मी म्हणाले.
"असू दे की! त्याला काय होतंय!"
"कशाला हवाय तुला तो?"
"आम्ही साप खातो! तुम्हांला माहीत नाही?"
पुढे ती म्हणाली, "त्याचं डोकं छाटायचं, कातडं विकायचं
आणि मांस शिजवायचं."
"हो, पण हा साप नको पकडूस तू," मी म्हटलं.
"मी पकडणारच!"
"नको बाळ."

## "पण का?"






मी काम करीत होते त्या समितीच्या कचेरीत मोयनाला ओढत घेऊन गेले. तिथे मोयनाची आई, खिरी, टोपली विणत बसली होती. इथे लोक लिहा-वाचायला शिकण्यासाठी येत असत. तर काही वेळा ते नुसतेच नाचायला किंवा गायला येत!

''ये,'' मी मोयनाला म्हटलं. ''आत ये आणि जरा बस.''

''का?''

''दमली नाहीस का तू?'' मी विचारलं.

मोयनाने जोराने नकारार्थी मान हलवली.

''मी बसले तर चरायला सोडलेल्या
बकऱ्या कोण परत आणेल?
लाकडं आणायची, पाणी आणायचं,
आणि पक्ष्यांसाठी जाळी लावायची,
कोण करणार हे सारं?''

मोयनाने एकामागून एक प्रश्न विचारले.

'' मोयना, साहेबांनी आपल्याला तांदूळ पाठवले आहेत, त्यांना सलाम करायला विसरू नकोस,'' खिरी तिला म्हणाली.

''का म्हणून?'' मोयनाने पुन्हा विचारलं.

''मी त्यांचा गोठा झाडते, त्यांची हजार कामं करते,

ते कधी मला सलाम करतात का?
मग मीच का म्हणून करायचा.''

असं म्हणत ती पळालीसुद्धा.

खिरीने मान हलवून एक सुस्कारा सोडला. ''असली पोर बघितली नव्हती कधी. कायम आपलं हिचं 'का? का?' सुरू असतं. म्हणून तर पोस्टातले मास्तर हिला का का कुमारी म्हणतात.''

''मला आवडते गं ती,'' मी म्हणाले.

''फार हट्टी आहे ती, काही ऐकत नाही. तुम्हांला उगाच तिचं कौतुक असतं,'' खिरी म्हणाली.



मोयना शबर होती. शबर ही एक गरीब आदिवासी जमात आहे. त्यांच्या मालकीची जमीन नव्हती. पण कधी कुणी याबद्दल कुरकुर केली नव्हती. फक्त मोयनाचे सारखे प्रश्न सुरू असत.

"मी नदीवर जाऊन पाणी का आणायचं? आपण गवताच्या झोपडीत का राहतो? आपल्या घरात दोन्ही वेळेला भात का खात नाहीत?"

गावातल्या जमीनदाराच्या किंवा सरकारी अधिकाऱ्यांच्या बकऱ्या घेऊन मोयना रानात जात होती खरी; पण म्हणून ती कधीही लाचार झाली नाही. तिचं काम संपलं, की ती संध्याकाळी घरी परत येई.

ती म्हणायची,

"त्यांचं उरलेलं मी कशाला खायचं?

मी भात, पालेभाजी, खेकड्याचं कालवण आणि लाल तिखट, असा छान स्वयंपाक करीन आणि आपण सगळे पोटभर जेवू."

शबर जातीत मुलींना कामावर पाठवायची प्रथा नव्हती. पण मोयनाच्या आईचा पाय अधू असल्याने तिला नीट चालता येत नसे. तिचे वडील काम शोधायला दूर गावी गेले होते. तिचा भाऊ गोरो हा रोज जंगलात लाकडं आणायला जात असे. त्यामुळे मोयनाला कामावर जाणं भागच होतं.



त्यावर्षी ऑक्टोबरमध्ये मी त्या खेड्यात महिनाभर राहिले होते. एके दिवशी सकाळी मोयनाने, 'ती माझ्याबरोबर राहणार' अशी घोषणा केली.

''नको,'' खिरी म्हणाली.

''का नको? चांगली मोठी आहे की झोपडी. एका म्हातारीला कितीशी जागा लागते?''

माझ्याकडे पाहत मोयना म्हणाली.

''आणि कामावर कसं जायला जमेल?'' तिच्या आईने विचारलं.

''जाईन की, पण नंतर मी इथंच येईन.'' मोयनाने ठासून उत्तर दिलं.

आणि आलीच ती. बरोबर कपड्यांचं बोचकं आणि मुंगसाचं पिलू!

''ते अगदी कमी खातं, आणि वाईट सापांना पळवून लावतं,'' ती म्हणाली. ''चांगले साप असले ना, की मी ते पकडते नि आईला देते. ती सापाचं छान कालवण करते. तुमच्यासाठी आणीन हं एकदा!''

आमच्या समितीतली शिक्षिका मालती मला म्हणाली, ''तिच्या 'का?' नी ती तुम्हांला अगदी भंडावून सोडेल बघा!''



मोयनाबरोबर माझा वेळ
छानच गेला!

"मीच का सरकारी
बाबूंच्या बकऱ्या
चरायला न्यायच्या?
त्यांच्या मुलांनी
न्याव्यात की!"




''मासे बोलत का नाहीत?''

“आकाशातले तारे इतके लहान का दिसतात? खरं तर ते सूर्यापेक्षासुद्धा मोठे असतात ना?”





एकदा रात्री तिने मला विचारलं,

"झोपण्यापूर्वी तुम्ही पुस्तक का वाचता?"

"कारण पुस्तकात तुझ्या सगळ्या 'का'ची उत्तरं सापडतात," मी उत्तर दिलं.
आणि कधी नव्हे ते मोयना गप्प बसली.
तिने खोली नीटनेटकी आवरली, फुलझाडांना पाणी घातलं आणि मुंगसाला मासळी खाऊ घातली. नंतर ती माझ्याजवळ येऊन म्हणाली, "मी पण वाचायला शिकेन आणि माझ्या प्रश्नांची उत्तरं शोधीन."

ती जेव्हा गुरं चरायला घेऊन जात असे, तेव्हा ती माझ्याकडून काय काय शिकली ते इतर सर्व मुलांना सांगत असे.

"तुम्हांला माहीत आहे का?

"सूर्यापेक्षा मोठे असलेले काही तारे आहेत. पण ते खूप दूर राहतात, म्हणून ते लहान दिसतात. सूर्य आपल्या जवळ आहे म्हणून तो मोठा दिसतो.

"मासे आपल्यासारखे बोलू शकत नाहीत. पण माशांचीही वेगळी भाषा असते. ते आपल्या भाषेत बोलत नाहीत.

पृथ्वी गोल आहे.... "

वर्षभरानंतर मी पुन्हा त्या खेड्यात गेले, तेव्हा सर्वांच्या अगोदर मला मोयनाचा आवाज ऐकू आला. ''शाळा का बंद आहे?'' एका केकाटणाऱ्या बकरीला ओढतच घेऊन येत मोयनाने शाळेच्या आवारात मालतीला हटकलं.

''का म्हणजे?'' मालतीने विचारलं.

''म्हणजे मी शिकायचंच नाही का?'' मोयनाने विचारलं.

''तुला कुणी थांबवलंय?''

''पण आत्ता वर्ग नाहीये!''

''आजच्या दिवसाची शाळा संपली,'' मालतीने सांगितलं.

''का?''

''अगं, मी सकाळी ९ ते ११ पर्यंतच शिकवते,'' मालती म्हणाली.

पाय आपटून मोयनाने ठणकावलं, ''तुम्हांला वेळ बदलता येणार नाही का? सकाळी मला बकऱ्या चरायला न्यायच्या असतात. मी अकरानंतरच येऊ शकते. तुम्ही शिकवलंच नाहीत तर मी शिकणार कशी. मी तुमचं नाव सांगेन त्या म्हाताऱ्या बाईंना,'' (म्हातारी बाई म्हणजे मीच!) ''जर तुम्ही वेळ बदलली नाहीत तर....''

इतक्यात तिचं माझ्याकडे लक्ष गेलं आणि ती बकरीसकट पळून गेली.

संध्याकाळी मी मोयनाच्या घरी गेले. स्वयंपाकघरातल्या चुलीजवळच्या उबेत मोयना तिच्या बहिणीला व मोठ्या भावाला सांगत होती, ''तुम्ही एक झाड कापा आणि दुसरी दोन लावा.

जेवणापूर्वी हात धुवायला हवेत.
का ते माहीत आहे का?
नाही धुतलेत तर पोटदुखी होईल.

तुम्हांला काहीच माहीत नाही, याचं कारण
माहीत आहे का?
कारण तुम्ही समितीच्या वर्गात
जात नाही!''



त्या खेडेगावातल्या प्राथमिक शाळेतली
पहिली विद्यार्थिनी कोण असेल असं तुम्हांला वाटतं?

मोयना!

ती आता अठरा वर्षांची आहे. ती समितीच्या शाळेत शिकवते. तुम्ही त्या वाटेने गेलात तर तिचा आग्रही आवाज तुम्हांला नक्कीच ऐकू येईल. ''आळसात वेळ घालवू नका. मला प्रश्न विचारा. डास नष्ट का केले पाहिजेत ते विचारा. ध्रुवतारा आकाशात नेहमी उत्तरेलाच का दिसतो?...''

आणि आता इतर मुलंही 'का' असं विचारायला शिकली आहेत.

मोयनाला मी तिची गोष्ट लिहितेय हे ठाऊक नाही. कळलं असतं तर तिने विचारलं असतं,

''माझ्याबद्दल लिहिताय? का?''

का? का? का? का? का? का? का?

''पण का?''

एक दहा वर्षांची मुलगी हा प्रश्न विचारत होती.
ती एका मोठ्या सापाच्या मागे लागली होती.
मी तिच्यामागे पळत गेले. तिची वेणी धरून
तिला मागे ओढत ओरडले, ''नाही, मोयना नको!''
''का नको?'' मोयनाने विचारलं.
''अगं, तो साधा गवत्या साप किंवा धामण नाही.
नाग आहे तो,'' मी म्हणाले.
''असू दे की! त्याला काय होतंय!''
''कशाला हवाय तुला तो?''
''आम्ही साप खातो! तुम्हांला माहीत नाही?''
''हो, पण हा साप नको पकडूस तू,'' मी म्हटलं.
''पण का?''



ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ३०
मोहन बिल्डिंग, १६२ ज. शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४
www.jyotsnaprakashan.com

